**<u>सहकारी सूतगिरण्या :</u>**
**सतत व समवर्ती लेखापरीक्षण योजना राबविण्यासाठी आवश्यक असणारी अस्थायी कर्मचाऱ्यांची २३ पदे सन २०२०-२१ या वर्षात पुढे चालू ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. अपदे - २७१७/प्र.क्र.१४/टेक्स१ (अ)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २३ जुलै, २०२०

**<u>वाचा :-</u>**

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. राजस - १००५/प्र.क्र.१८१/५-स, दि.३१ जानेवारी, २००६.
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. राजस - १००८/प्र.क्र.५३८/५-स, दि.०५ मे, २०११.
३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.अपदे-२७१७/प्र.क्र.१४/टेक्स १(अ), दि.१९ मार्च, २०१९.
४) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.अपदे-२७१७/प्र.क्र.१४/टेक्स १(अ), दि.२३ ऑक्टोबर, २०१९.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र जा.क्र. आस्थापना/ कक्ष-४/ सुतगिरणी/मुदतवाढ/३९७/२०१९, दि.१८.०३.२०२०.
७) वित्त विभाग, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०

**<u>प्रस्तावना :-</u>**

वाचा क्र.४ येथील दि.२३ ऑक्टोबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सहकारी सूतगिरण्यांकरीता सतत व समवर्ती लेखापरीक्षण योजना राबविण्यासाठी आवश्यक असणारी २३ अस्थायी पदे दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आली होती. सदर योजनेतील २३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

वाचा क्र.२ येथील दि.०५ मे, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये या विभागातील स्थायी व अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार ९३१९ पदांच्या सुधारीत आकृतबंधास मंजूरी देण्यात आली आहे. त्यामध्ये सतत व समवर्ती लेखापरीक्षण योजने अंतर्गत खाली दर्शविण्यात आलेल्या २३ अस्थायी पदांचा समावेश असल्याने सदर २३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदनाम | पदाची वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१ | एस - २० : ५६१००-१७७५०० | ४ |
| २ | लेखापरिक्षक, श्रेणी-२ | एस - १३ : ३५४००-११२४०० | ६ |
| ३ | उपलेखापरिक्षक | एस - ८ : २५५००-८११०० | ४ |
| ४ | कनिष्ठ लिपीक | एस -६ : १९९००-६३२०० | ६ |
| ५ | शिपाई | एस - १ : १५५००-४७६०० | ३ |
| | **एकूण पदे** | | **२३** |

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. व्ही - २, २४२५ - सहकार, १०१, सहकारी संस्थांची लेखापरीक्षा, (०१) (०१) लेखापरीक्षेसाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२० अन्वये अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२३१६२१४१५५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prasenjeet Karlekar

Digitally signed by Prasenjeet Karlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operating Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, cn=Prasenjeet Karlekar
Date: 2020.07.23 16:38:36 +05'30'

**( प्रसेनजित कारलेकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता/), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र- २, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र- २, नागपूर.
३. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
४. का.अ., ५-स, १२-स, १७-स, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. का.अ., व्यय २/ अर्थसंकल्प -१३, वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६.सहकार, आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. आयुक्त, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरीक्षण), पुणे.
९. विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था (सूतगिरण्या) सांगली/ अमरावती/ सोलापूर / इचलकरंजी

१०. जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, सांगली/कोल्हापूर/सोलापूर/अमरावती.

११. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला. मंत्रालयासमोर, मुंबई ३२ (२ प्रती).

१२. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली/कोल्हापूर/सोलापूर/अमरावती.

१३. निवड नस्ती (टेक्स-१ (अ) / टेक्स-१ (ब)).